**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या संवर्गातील अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना हजर करुन घेणे व त्यांना पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली-२०२१/प्र.क्र.२७४(२)/सेवा-३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, १० मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २६ नोव्हेंबर, २०२१

**<u>प्रस्तावना</u> :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ ( वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५०० ) या संवर्गातील काही वैद्यकीय अधिकारी हे विविध कारणास्तव शासनाची पूर्व परवानगी न घेता प्रदीर्घ कालावधीसाठी अनधिकृत गैरहजर होते. सार्वजनिक आरोग्य सेवा ही अत्यावश्यक सेवा असल्याने तसेच विभागांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांची कमतरता असल्याने सदर अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना विहीत अटी व शर्तीच्या अधीन राहून त्यांच्या अनधिकृत गैरहजेरी नंतर शासन सेवेत पुनश्च रुजू करुन घेऊन त्यांना पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकारी हे प्रदीर्घ काळापासून अनधिकृतरित्या गैरहजर होते. खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांना या परिच्छेदातील तक्त्याखाली नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून रूजू करुन घेण्यात येत असून, त्यांना वैद्यकीय अधिकारी गट-अ या पदावर रुजू होण्यासाठी तशी पदस्थापना खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्याप्रमाणे देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नांव | अनधिकृत गैरहजेरीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १. | डॉ.विनोद गोवर्धनदास जेठवाणी | प्रा आ कें कुरुम ता मुर्तिजापूर जि अकोला |
| २. | डॉ. सरस्वती अप्पासाहेब कोळी | प्रा आ कें खारेपाटण ता कणकवली जि सिंधुदुर्ग |

## २. <u>अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून रुजू करुन घेण्यात येत आहे</u> :-

१. प्रस्तुत प्रकरणी रुजु होणाऱ्या अनधिकृत वैद्यकीय अधिकाऱ्यांपैकी जे वैद्यकीय अधिकारी विनापरवानगी पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमास प्रवेश घेतल्याने, वैद्यकीय कारणास्तव व अन्य खाजगी कारणास्तव विनापरवानगी अनधिकृत गैरहजर आहेत, अशा अनधिकृत गैरहजर (एमबीबीएस अर्हता धारक व विशेषज्ञ) वैद्यकीय अधिकाऱ्यांना जरी रुजू करुन घेण्यात येत असले तरी, त्यांचा अनधिकृत

गैरहजर कालावधी हा ते ज्या कारणास्तव गैरहजर होते त्याचा प्रकरणपरत्वे विचार करुन त्यांचा अनधिकृत गैरहजेरीचा कालावधी हा त्यांनी दिलेल्या कारणाचा व त्या अनुषंगाने सादर केलेल्या कागदोपत्री पुराव्याचे आधारे तो कालावधी अनधिकृत गैरहजरी, असाधारण रजा (विनावेतन), यामधून कसा नियमित करावयाचा त्याबाबत वित्त विभागाच्या दिनांक १० ऑक्टोंबर, २०१७ च्या शासन परिपत्रकातील तरतुदी तसेच म.ना.से. (सेवानिवृत्ती) नियम, १९८२ मधील नियम ४७ (१), म.ना.से. (रजा) नियम,१९८१, यामधील तरतुदी विचारात घेवून आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्याकडून प्रकरणपरत्वे तसा सविस्तर प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन तद्नंतर निर्णय घेण्यात येईल व तो निर्णय उक्त नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांना बंधनकारक राहील.

२. संबंधित वैद्यकीय अधिका-यांना रुजू करुन घेण्यापूर्वी त्यांची वैद्यकीय मंडळाकडून वैद्यकीय तपासणी करुन ते सेवा करण्यास शारीरिक / मानसिकदृष्ट्या सक्षम असल्याबाबत वैद्यकीय मंडळाचे प्रमाणपत्र घ्यावे.

३. संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांचा चारित्र्य व वर्तणूक अहवाल (पोलीस तपास अहवाल) घ्यावा. (फौजदारी स्वरुपाचा / तसेच लाचलुचपत प्रतिबंधक कायद्यांतर्गत कोणत्याही स्वरुपाची तक्रार प्रलंबित नसल्याचा पोलीस अहवाल घ्यावा.)

४. अनधिकृत गैरहजेरीच्या कालावधीत संबंधीत वैद्यकीय अधिकारी कोणताही खाजगी व्यवसाय / नोकरी किंवा परदेश दौरा केला नसल्याबाबत शपथपत्र शासन माहितीसाठी संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

३. या आदेशान्वये पदस्थापना देण्यात आलेल्या अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी पदस्थापनेचे सदर आदेश प्राप्त झाल्यानंतर उक्त नमूद अटी व शर्तींच्या पुर्तता करुन तात्काळ त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२६१७०७२५९०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE
VIJAYKUMAR
LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.11.26 17:35:14 +05'30'

( वि. ल. लहाने )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला व कोल्हापूर.

४) जिल्हा शल्यचिकित्सक , अकोला व सिंधुदुर्ग.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपुर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला व सिंधुदुर्ग.
७) जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा परिषद अकोला व सिंधुदुर्ग.
८) सर्व संबंधित वैद्यकीय अधिकारी गट-अ (संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांचे मार्फत)
९) निवड नस्ती सेवा-३.